राष्ट्रीय चळवळीत भाग घेतलेल्या शासकीय
कर्मचाऱ्यांना जादा अर्हता सेवा मंजूर
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
निर्णय क्रमांक सीएनएस-१०८०/१७३२/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३० जून १९८२.

वाचा :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-१०७५/३८१/४७५/१६,
दिनांक ६ सप्टेंबर १९७६.

निर्णय :- शासन निर्णय क्रमांक सीएनएस-१०७५/३८१/४७५/१६, दिनांक ६ सप्टेंबर १९७६ अन्वये ज्या शासकीय कर्मचाऱ्यांनी राष्ट्रीय चळवळीमध्ये भाग घेतला आणि शासन परिपत्रक, पोलिटिकल अँड सर्व्हिसेस डिपार्टमेंट क्रमांक २७६०/४६, दिनांक २० एप्रिल १९४९ अन्वये देण्यात आलेल्या वयाची अट शिथिल करण्याच्या सवलतीचा लाभ घेऊन जे दिनांक ३१ डिसेंबर १९५१ पूर्वी शासकीय सेवेत रुजू झाले अशा कर्मचाऱ्यांना सेवा निवृत्ती वेतनाकरिता (परंतु इतर कोणत्याही निवृत्ती वेतनाकरिता नाही) त्यांच्या एकूण सेवाकालाचा ४ था हिस्सा किंवा शासकीय सेवेतील नियुक्तीचे वेळी त्यांचे वय २५ वर्षांपेक्षा जेवढ्या कालावधीने जास्त होते तेवढा कालावधी किंवा ५ वर्षांचा कालावधी, यांपैकी जो सर्वात कमी कालावधी असेल तेवढा कालावधी सेवा अर्हता निवृत्ती वेतनाकरिता सेवा कालावधी म्हणून जमेस धरण्याबाबत परवानगी देण्यात आली आहे.

२. ज्या शासकीय कर्मचाऱ्यांनी राष्ट्रीय चळवळीत भाग घेतला आणि शासन परिपत्रक, पोलिटिकल अँड सर्व्हिसेस डिपार्टमेंट क्रमांक २७६०/४६, दिनांक २० एप्रिल १९४९ अन्वये देण्यात आलेल्या वयाच्या सवलतीचा लाभ घेऊन जे ३१-१२-१९५१ नंतर भरती झाले, त्यांना ही सवलत देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासन असा आदेश देत आहे की, ज्या शासकीय कर्मचाऱ्यांनी राष्ट्रीय चळवळीत भाग घेतला आणि जे शासन परिपत्रक, पोलिटिकल अँड सर्व्हिसेस डिपार्टमेंट क्रमांक २७६०/४६, दिनांक २० एप्रिल १९४९ अन्वये देण्यात आलेल्या वयाच्या सवलतीचा लाभ घेऊन दिनांक ३१ डिसेंबर १९५१ नंतर शासकीय सेवेत भरती झालेले असतील त्यांनाही शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक सीएनएस-१०७५/३८१/४७५/१६, दिनांक ६ सप्टेंबर १९७६ अन्वये देण्यात आलेला लाभ देण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभागाच्या अनुमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सीआर-९३७/७२/एसईआर-४, दिनांक ३१ मे १९८२ अन्वये काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्र. द. मराठे,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

राज्यपाल यांचे सचिव,

कृ. मा. प.

एन-४४९(४५००-६-८२)

मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री/उपमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*सचिव, सर्व विभागीय निवड मंडळे,
महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र २, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग कार्यासन क्रमांक १२, १३-अ, विशेष कार्य कक्ष, स्थायीन ठेविक कक्ष.

---

*पत्राने.

मुव-४४९(४५९०-७-८२)अ.